महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन ज्ञापन क्र. कुआयो-०४१९/प्र.क्र.१११/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक १२ फेब्रुवारी २०२०.

विषय :- महाराष्ट्र पोलीस कुटुंब आरोग्य योजना याच्या प्रयोजनासाठी चालू वित्तीय वर्षात (सन २०१९-२०) आणखी अनुदान खर्च करण्यास मंजुरी देणेबाबत.

संदर्भ :-

१) शा.नि., गृह विभाग, क्र. पीडब्ल्यूएफ-१२०४/ १४३/ प्र.क्र.२/ भाग-३/ पोल-७, दिनांक २८.०७.२००६.

२) शासन पत्र, गृह विभाग, क्र. कुआयो-०४१९/ प्र.क्र.१११/ पोल-७, दिनांक १५.०५.२०१९.

३) शासन पत्र, गृह विभाग, क्र. कुआयो-०४१९/ प्र.क्र.१११/ पोल-७, दिनांक १६.०९.२०१९.

४) शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. कुआयो-०४१९/ प्र.क्र.१११/ पोल-७, दिनांक ०५.१२.२०१९.

५) पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २८/ मपोकुआयो/ अंदाजपत्रक/ १९-२०/ १६४/ २०१६, दिनांक १६.०१.२०२०.

६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक २२.०१.२०२०.

ज्ञापन.

शा.नि., गृह विभाग, क्र. पीडब्ल्यूएफ-१२०४/ १४३/ प्र.क्र.२/ भाग-३/ पोल-७, दिनांक २८.०७.२००६, व्दारे “महाराष्ट्र पोलीस कुटुंब आरोग्य योजना” ही नवीन योजना चालविण्यास मान्यता देण्यात आली आहे. या योजनेची अंमलबजावणी पोलीस महासंचालक, म.रा., व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्याकडून करण्यात येते.

२. पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या बाबतीत उक्त योजनेचा खर्च हा, गृह विभाग-मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस, ००, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०१) पोलीस निरीक्षणालय (२०५५००१४) (अनिवार्य), ०१-वेतन, या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा अशी तरतूद उक्त शासन निर्णयात करण्यात आली आहे. त्या अनुसार, उक्त योजनेच्या प्रयोजनासाठी चालू वित्तीय वर्षात रु.५०,००,००,०००/- (रुपये पन्नास कोटी फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास शासन पत्र, गृह विभाग, क्र. कुआयो-०४१९/ प्र.क्र.१११/ पोल-७, दिनांक १५.०५.२०१९ व १६.०९.२०१९ आणि शासन ज्ञापन, गृह विभाग, क्र. कुआयो-०४१९/ प्र.क्र.१११/ पोल-७, दिनांक ०५.१२.२०१९, यांद्वारे मंजुरी देण्यात आली आहे.

३. उक्त योजनेच्या प्रयोजनासाठी चालू वित्तीय वर्षात आणखी रु.१०,००,००,०००/- खर्च करण्यास मंजुरी मिळणेबाबत पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाने विनंती केली आहे.

४. त्या अनुसार, महाराष्ट्र पोलीस कुटुंब आरोग्य योजना याच्या प्रयोजनासाठी चालू वित्तीय वर्षात (सन २०१९-२०), उक्त लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून आणखी रु.१०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास, याद्वारे, मंजुरी देण्यात येत आहे.

५. हे शासन ज्ञापन, अनौपचारिक संदर्भ, वित्त विभाग, क्र.७२/२०२०/व्यय-७, दिनांक २८.०१.२०२०, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००२१२१३२४००५०२९ असा आहे. हे शासन ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2020.02.12 13:26:45 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
पोलीस महासंचालक,
म.रा., मुंबई.

प्रत-

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३) प्रधान महा लेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४) महा लेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५) कार्यासन अधिकारी (अर्थसं.-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ अर्थ-११), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड फाईल (पोल-७).